वितरण आदेश क्र.६
सन २०१९-२०

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
या संस्थेस सहाय्यक अनुदान २०१७-२०१८ (अनिवार्य)
अंतिम हप्ता

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०१९/प्र.क्र.५० /१९/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ मार्च ,२०२०

वाचा : १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९ /प्र.क्र.४४/अर्थसंकल्प ३, दि.१ एप्रिल, २०१९.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०१९/ प्र.क्र.९६ /२०१९/२५, दि.१ एप्रिल, २०१९.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.यशदा २०१९ /प्रक्र.५०/१९/ १२-अ, दि.२२ एप्रिल,२०१९.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९ /प्र.क्र. ९२ /अर्थ- ३, दि. ८ जुलै, २०१९.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९ /प्र.क्र. ९२ /अर्थ- ३, दि. २२ जानेवारी, २०२०.
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०१९/ प्र.क्र.९६ /२०१९/२५, दि. २५ जानेवारी, २०२०

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेच्या २०१९-२०२० या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **रु.४००.०० लाख (रुपये चारशे लाख फक्त)** इतकी तरतूद केली असून, त्यापैकी **रु.२००.०० लाख (रुपये दोनशे लाख फक्त)** एवढे लेखा अनुदान संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन परिपत्रकान्वये **एप्रिल ते जूलै २०१९ या चार महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी योजनेतर खर्चासाठी** मंजूर करण्यात आले होते. आता संदर्भाधीन क्रमांक ५ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने ८० %च्या मर्यादेत अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेला वरील अनुदानातून **एप्रिल ते जूलै २०१९ या चार महिन्यांकरिता योजनेतर खर्चासाठी (प्रशिक्षण शुल्क ) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेले एकूण रु.२००.०० लाख (रुपये दोनशे लाख फक्त)** इतके सहाय्यक अनुदान **( पहिला हप्ता ) म्हणून** मंजूर करण्यात आले आहे.

आता संस्थेस **ऑगस्ट, २०१९ ते फेब्रुवारी, २०२० या सात महिन्यांकरिता अनिवार्य खर्चासाठी ( प्रशिक्षण शुल्क)** वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ च्या परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ८०% च्या मर्यादेत, वेतनेतरकरिता **अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून रु. १२०.०० लाख ( अक्षरी रुपये एकशे वीस लाख फक्त )** इतके सहायक अनुदान ( अंतिम हप्ता ) मंजूर करण्यात येत आहे.

३. हा खर्च मागणी क्र .ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण (००) (०६) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यास सहाय्यक अनुदान (अनिवार्य ) (२०७००५३२) - ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" याखाली सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१९-२०२० मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सीमित ठेवावा.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई व शासनाला तातडीने सादर करावे.

७. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. यशदा, पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी (कोड क्र.२२०१०००१२१) यांनी संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या सहायक अनुदानाची रक्कम **रु. १२०.०० लाख ( अक्षरी रुपये एकशे वीस लाख फक्त** )) आहरित करावी.

९. यशदा, पुणे या संस्थेने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र.७ मध्ये नमूद केल्यानुसार देयक कोषागार अधिकारी यांना सादर करतांना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाऊंट स्टेटमेंट ( Bank Account Statement ) देयकासोबत जोडण्यात यावे.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ११४ / व्यय ४, दि.१३.३.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१९१५२५१३४५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Rohini Bhalekar
Date: 2020.03.19 15:28:40 +05'30'

**( रोहिणी भालेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-२, नागपूर,
३. मा. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
४. महासंचालक, यशदा, पुणे.
५. लेखाधिकारी, यशदा, पुणे. (२ जादा प्रतींसह).
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. उप कोषागार कार्यालय, पुणे.
८. वित्त विभाग (व्यय-४ / अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र.२५, मुंबई - ३२.
१०. निवड नस्ती./१२-अ